शासनाच्या गुंठेवारी योजने अंतर्गत
नियमानुकूल करावयाच्या
बांधकामा खालील जमीनी भूतपूर्व
इनामाच्या असल्यास, अशा प्रकरणात
जमिनीच्या अकृषीक वापरापोटी
आकारण्यात येणा-या शासनाच्या
अनर्जित उत्पन्नावरील हिस्या संदर्भात
सवलत देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शा.नि.क्र.वतन २००७/४६२/प्र.क्र.१०४/ल-४
महसूल व वन विभाग
मंत्रालय,मुंबई :- ४०० ०३२
दिनांक :- ३ मे,२०१०

**प्रस्तावना :-**

राज्यात, गुंठेवारी पध्दतीने ज्या जमिनी विक्री केल्या गेल्या त्या जमिनीवरील बांधकामे नगर विकास विभागाने महाराष्ट्र गुंठेवारी विकास अधिनियम २००१ च्या तरतुदीनुसार बांधकामावर प्रशमन फी व विकास आकार आकारुन नियमानुकूल केली. असे असले तरी ज्या वतन/इनाम जमिनी अशा पध्दतीने विकलेल्या आहेत, त्यांचा विहित नियमानुसार शासनास नजराणा मिळणे आवश्यक आहे. सर्वसाधारणपणे पूर्वपरवानगीने वतन जमिनीचे हस्तांतरण झाल्यास शिघ्रसिध्द गणकानुसार ५०% नजराणा आकारला जातो. ज्या जमिनी बिनशेती कारणासाठी विनापरवानगी हस्तांतरित झाल्या आहेत, अशा जमिनीच्या प्रचलित नियमानुसार शिघ्रसिध्द गणकानुसार येणा-या मूल्यांकनाच्या ५०% नजराणा व नजराण्यावर ५०% दंड म्हणजे, एकूण ७५% रक्कम आकारली जाते. गुंठेवारी योजनेव्दारे बांधकामे नियममानुकुल करण्यासाठी नगर विकास विभागाकडून विशिष्ट फी आकारली जाते. शिवाय सदर जमीन जर इनाम असेल तर तिच्या अनधिकृत हस्तांतरणापोटी महसूल विभागातर्फे मुल्याकंनाच्या ७५% रक्कम आकारली जाते. अशाप्रमाणे सर्वसामान्य जनतेवर दुहेरी बोजा पडत असल्याच्या तक्रारी/निवेदने शासनाकडे प्राप्त झाल्या आहेत. त्या अनुषंगाने सर्वसामान्यास काही प्रमाणात दिलासा देण्याच्या दृष्टीने शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

गुंठेवारी कायद्यांतर्गत ज्या वतन/इनाम जमिनीवरील बांधकामे नियमित करण्यात आलेली आहेत, त्या जमिनीचा नजराणा आकारताना, ज्या दिनांकास गुंठेवारी कायद्यांतर्गत अनधिकृत बांधकाम नियमानुकूल करण्याचे आदेश, सक्षम प्राधिकाऱ्यांनी

दिलेले असतील, त्या दिनांकाच्या बाजारमुल्याच्या २५% इतकी रक्कम, अनर्जित उत्पन्नातील शासनाचा हिस्सा म्हणून भरुन घ्यावी. सदर योजना, या यासंदर्भात शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून, केवळ एक वर्षाकरिता कार्यरत राहील. एक वर्षानंतर वतन/इनाम जमिनीचा अनधिकृत अकृषिक वापर नियमानुकूल करण्या संदर्भात पूर्वीचे ७५% नजराण्याबाबतचे आदेश लागू राहतील.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra. gov. in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक 201005051442 2001 आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

03/5

(रमाकांत अस्मर)
सह सचिव
महसूल व वन विभाग

प्रत,

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी
३) उपविभागीय अधिकारी
४) सर्व तहसिलदार
५) उपसचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई ३२
६) निवडनस्ती

3/5/10
Issued
1284

124.lwp